**आदिवासी उपयोजनांतर्गत रस्ते व पुल यांच्या बांधकामाकरीता**
<u>बचतीमधून उपलब्ध झालेल्या तरतूदीचे वितरण........</u>

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.साबांवि-२०१०/प्र.क्र.८७/का.५**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ३१ मार्च, २०१०**

**प्रस्तावना :-** आदिवासी उपयोजना क्षेत्रातील रस्ते, पुल यांच्या प्रगतीपथावरील व चालू कामांच्या बांधकामाच्या थकित देयकासाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षात आदिवासी उपयोजना अंतर्गत झालेल्या बचतीतून निधी उपलब्ध करुन देण्याचे प्रस्तावित होते.

**<u>शासन निर्णय :-</u>** आदिवासी क्षेत्रातील प्रगतीपथावरील रस्ते, पुल व साकव यांच्या कामासाठी उपलब्ध झालेल्या बचतीमधून सेंटेज चार्जेस वगळून सन २००९-१० या चालू आर्थिक वर्षाकरिता "रस्ते विकास" या शिर्षाखाली सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-२ मध्ये दर्शविलेल्या योजनांच्या तरतूदी स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या नियंत्रक अधिकाऱ्यांच्या अधिनस्त खर्च करण्यासाठी ठेवण्यास खालील अटींच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे :-

अ) सोबत जोडलेल्या विवणपत्रात दर्शविलेल्या जिल्ह्यातील १०० ते ८० टक्के पूर्ण झालेल्या कामांसाठीच सदर तरतूदीतून निधी उपलब्ध करुन द्यावा.

ब) सोबत जोडलेल्या विवणपत्रात दर्शविलेल्या जिल्ह्यातील १०० ते ८० टक्के पूर्ण झालेली कामे ही आदिवासी उपयोजना क्षेत्रातील (टिएसपी) असावीत व अर्थसंकल्पात (भाग तीन - परिशिष्टे - परिशिष्ट - ड) असावीत.

क) आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील रस्त्यांच्या कामांना निधी उपलब्ध करुन देता येणार नाही.

ड) सोबत जोडलेल्या विवणपत्रात दर्शविलेल्या जिल्ह्यातील १०० ते ८० टक्के पूर्ण झालेली कामे आदिवासी उपयोजनेखालील आहेत याबाबत अधिक्षक अभियंता यांच्या स्वाक्षरीने प्रमाणपत्र सादर करावीत व कोणत्या वर्षी अर्थसंकल्पीत झाली याचा उल्लेख करावा. यबाबत अधिक्षक अभियंता यांच्या प्रमाणपत्राशिवाय प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त यांचे प्रमाणपत्र ग्राह्य धरण्यात येणार नाही.

इ) आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील रस्त्यांच्या कामांना निधी उपलब्ध करुन दिल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित अधिक्षक अभियंता यांची राहील. याबाबत प्रकल्प अधिकारी/अपर आयुक्त यांच्या प्रमाणपत्राच्या आधारे अधिक्षक अभियंता यांना जबाबदारी टाळता येणार नाही. अनियमितता आढळून आल्यास शिस्तभंगाच्या कारवाईसह खर्च झालेला निधी संबंधित कार्यकारी व अधिक्षक अभियंता यांच्याकडून वसूल करण्यात येईल.

ई) ज्या कामावर खर्च करण्यात आला त्याची यादी माहितीसह आदिवासी विकास विभागास सादर करावी.

उ) रस्ते/पुलांची कामे टिएसपी/ओटिएसपी/माडा/मिनीमाडा या क्षेत्रातील असल्याबाबत संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता (सा.बां.) यांनी खात्री करुन सोबत जोडलेल्या **"प्रपत्र-अ"** मध्ये विहित नमुन्यामध्ये प्रमाणित करण्यात यावे.

२. अंमलबजावणी अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य कार्यक्रमांवर/योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी. सदर तरतूदी संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

३. आदिवासी उपयोजना क्षेत्रातील ज्या रस्त्यांची कामे हाती घेण्यात आली आहेत त्याच रस्त्यांच्या कामांवर तरतूद खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील रस्त्यांवर खर्च करण्यात येऊ नये. आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील रस्त्यांची कामे जरी अर्थसंकल्पात समाविष्ट झाली असतील तरी आदिवासी उपयोजनेखालील तरतूद आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील रस्त्यांच्या कमावर खर्च करता येणार नाही. जर आदिवासी उपयोजनेखालील तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेरील रस्त्यांवर खर्च झाली तर त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांची राहील व झालेल्या खर्चाची भरपाई संबंधितांच्या वेतनातून करण्यात येईल.

४. आदिवासी उपयोजनेंतर्गत घेण्यात आलेली रस्त्यांची कामे या विभागाच्या शासन निर्णय क्रमांक टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५, दिनांक ९ मार्च, १९९० मध्ये नमूद केलेल्या गावांच्या यादीतील आहेत याची खात्री करुन तरतूद वितरीत करावी.

५. कोषागाराकडे देयके सादर करताना कार्यकारी अभियंता यांनी स्वत:च्या स्वाक्षरीने सदर निधी आदिवासी उपयोजना क्षेत्रातील रस्त्यांवर खर्च होणार आहे असे प्रमाणपत्र द्यावे. सदर दाखला संबंधित प्रकल्प अधिकारी यांचा ग्राह्य धरण्यात येणार नाही, याची दक्षता घ्यावी. स्वत: खात्रीकरुन संबंधित आहरित अधिकारी यांनी दाखला द्यावा.

६. अंमलबजावणी अधिकारी/विभाग प्रमुख यांनी प्रचलित नियम कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१००३३१२०३५१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(पी.आर.भोसले )
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/अमरावती/ठाणे.
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधानभवन, मुंबई.

महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर. (प्रत्येकी ५ प्रती)
जिल्हाधिकारी, वर्धा/बुलढाणा/वाशिम/हिंगोली/गोंदिया/भंडारा/नागपूर/ठाणे/रायगड/नंदुरबार/नाशिक/अहमदनगर/ जळगांव/धुळे/पुणे/अमरावती/यवतमाळ/गडचिरोली/चंद्रपूर/नांदेड/अकोला.
विभागिय आयुक्त, मुंबई/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती /पुणे.
जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ, वर्धा/बुलढाणा/वाशिम/हिंगोली/गोंदिया/

भंडारा/नागपूर/ठाणे/रायगड/नंदुरबार/नाशिक/अहमदनगर/जळगांव/धुळे/पुणे/अमरावती/यवतमाळ/ गडचिरोली/चंद्रपूर/ नांदेड/अकोला.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा/बुलढाणा /वाशिम/ हिंगोली/गोंदिया/ भंडारा/ नागपूर/ ठाणे/रायगड/नंदुरबार/नाशिक/अहमदनगर/जळगांव/धुळे/पुणे/अमरावती/यवतमाळ/गडचिरोली/ चंद्रपूर/नांदेड/अकोला.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा/बुलढाणा/वाशिम/हिंगोली/गोंदिया/भंडारा/नागपूर/ठाणे/रायगड/नंदुरबार/नाशिक/ अहमदनगर/जळगांव/धुळे/पुणे/अमरावती/यवतमाळ/गडचिरोली/चंद्रपूर/नांदेड.
मुख्य लेखा व वित्तीय अधिकारी, वर्धा/बुलढाणा/वाशिम/ हिंगोली/गोंदिया/भंडारा/ नागपूर/ठाणे/रायगड/नंदुरबार/ नाशिक/अहमदनगर/जळगांव/धुळे/पुणे/अमरावती/यवतमाळ/गडचिरोली/चंद्रपूर/नांदेड/अकोला.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे/पुणे/ नागपूर/जळगांव/ धुळे/नाशिक/ अमरावती/चंद्रपूर/ अहमदनगर/नांदेड/यवतमाळ/अकोला.
अधिक्षक अभियंता, विशेष प्रकल्प मंडळ, नागपूर
अधिक्षक अभियंता, विशेष प्रकल्प मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे/नागपूर/मुंबई/औरंगाबाद.
वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
सार्वजनिक बांधकाम विभाग (अर्थ-१) (२ प्रती), मंत्रालय, मुंबई-३२.
सर्व अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती (का-६)

## जनजाती क्षेत्र उपयोजनेखालील २००९-१० चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप

| शिर्ष : रस्ते व पूल.<br>योजनेचे नांव : जिल्हा रस्ते सर्वसाधारण.<br>(चालू कामे)<br>(रुपये हजारात) | | मागणी क्रमांक टी : ५<br>मुख्य लेखाशिर्ष : ३०५४-रस्ते व पूल-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (०२) सर्वसाधारण (राज्य मार्ग निधी)<br>(३०५४ ०४०७) २७-लहान बांधकामे | | |
|---|---|---|---|---|
| जिल्हयाचे नांव | २००९-१० साठी केलेली तरतूद | २००९-१० ची अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| राज्यस्तरीय योजना | | संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ. | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२. | |
| नाशिक | २५७२५ | | | |
| रायगड | १०७२५ | | | |
| जळगांव | ५३०० | | | |
| नंदुरबार | ७५७२५ | | | |
| धुळे | १५५२५ | | | |
| एकूण - | १३३००० | | | |

## जनजाती क्षेत्र उपयोजनेखालील २००९-१० चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप

| शिर्ष : रस्ते व पूल.<br>योजनेचे नांव : जिल्हा व इतर मार्ग (किमान गरजा कार्यक्रम)<br>( चालू कामे)<br>(रुपये हजारात) | | मागणी क्रमांक टी : ५<br>मुख्य लेखाशिर्ष : ३०५४-रस्ते व पूल-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०४-जिल्हा व इतर मार्ग-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (०१) राज्य मार्ग निधी<br>(३०५४ ०३६३) २७, लहान बांधकामे | | |
|---|---|---|---|---|
| जिल्हयाचे नांव | २००९-१० साठी केलेली तरतूद | २००९-१० ची अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| राज्यस्तरीय योजना | | संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ. | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२. | |
| नाशिक | ४५०० | | | |
| रायगड | ७८२० | | | |
| नंदुरबार | २४२७५ | | | |
| एकूण - | ३६५९५ | | | |

## "प्रपत्र-अ"

## प्रमाणपत्र

मी याव्दारे प्रमाणित करतो की, ---------------------------------------- हा रस्ता तालुका -------------- जिल्हा --------------------------- शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५, दिनांक ९ मार्च, १९९० अन्वये आदिवासी उपयोजना/अतिरिक्त आदिवासी उपयोजना/माडा/मिनीमाडा क्षेत्रातील असल्याबाबत मी स्वतः खात्री केली असून, हे खरे आहे. याबाबत मी व्यक्तीशः जबाबदार राहील. संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी खात्री करुन हे प्रमाणपत्र द्यावे. प्रकल्प अधिकारी यांच्याकडून प्रमाणीत करुन घेतल्यास हे प्रमाणपत्र ग्राह्य धरण्यात येणार नाही, याची काळजी संबंधितांनी घ्यावी. प्रमाणित करतांना शासकीय आदेश क्र. टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५, दिनांक ९ मार्च, १९९० प्रमाणे आदिवासी उपयोजना/अतिरिक्त आदिवासी उपयोजना /माडा/मिनीमाडा यांची यादी पाहून खात्री करावी.

कार्यकारी अभियंता